रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या अधिपत्त्याखाली असलेल्या अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या लाभार्थ्यांना कर्ज माफी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
रोजगार व स्वयंरोजगार विभाग,
**शासन निर्णय**, क्रमांकः अपामं-२००९/प्र.क्र. १०८/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय भवन, १४ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ ऑगस्ट, २००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांसाठी "अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ" या महामंडळाची स्थापना दि.२७/११/१९९८ रोजी कंपनी कायदा १९५६ अन्वये करण्यात आली आहे. राज्यातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांचा सर्वांगिण विकास निधीचे पाठबळ देवून करणे हा महामंडळाचा मुख्य उद्देश आहे.

महामंडळाचा लाभार्थी हा प्रामुख्याने ग्रामीण भागातील असून आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांपैकी आहे. आर्थिक परिस्थिती दुर्बल असल्याने या लाभार्थ्यांसमोर शासनाकडून कुठल्याही योजने अंतर्गत कर्ज घेण्याचा एकमेव मार्ग शिल्लक असतो. लाभार्थी हा गरीब किंवा मजुरी करणा-या कुटुंबातील असल्यामुळे त्यांना नोकरी विषयी जास्त आकर्षण असते व स्वयंरोजगाराबाबत त्यांना जास्त ओढ नसते. लाभार्थ्यांनी त्यांच्या भौगोलिक परिस्थितीनुसार कुठला व्यवसाय निवडावा याचे त्यांना ज्ञान नसते. त्यामुळे, त्यांच्या शेजारी व चांगला व्यवसाय असेल तोच ते निवडतात. व्यवसाय निवडल्यानंतरही त्यास आवश्यक कच्चा माल, तयार मालाची बाजारपेठ, आजच्या स्पर्धात्मक युगात तग धरुन उभे राहणे याबद्दल त्यांना फारशी माहिती नसते. परिणामी, त्यांचा व्यवसाय तोटयात जावून तो बंद पडतो. या काही कारणांमुळे महामंडळाने वितरीत केलेल्या कर्जाचे हप्ते लाभार्थी भरु शकत नाही. यामुळे महामंडळाने लाभार्थ्याला वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम वसूल होत नाही. यादृष्टीने महामंडळाकडून वितरीत करण्यात आलेल्या कर्जाची थकीत रक्कम माफ करण्याबाबतची मागणी विविध स्तरावरुन व लोक प्रतिनिधींकडून सातत्याने करण्यात येत होती. ही बाब दि.२०/८/२००९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत विचारार्थ घेण्यात येवून त्यास मान्यता देण्यात आली होती. त्या अनुषंगाने अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या लाभार्थ्यांना कर्जमाफी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रोजगार व स्वयंरोजगार विभागाच्या अधिपत्त्याखालील अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या लाभार्थ्यांना खालील प्रमाणे कर्जमाफी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहेः-

१. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळामार्फत वाटप करण्यात आलेल्या कर्जापैकी सर्व लाभार्थ्यांकडे दि.३१/३/२००७ अखेर थकीत असलेले महामंडळाचे व्याजासह कर्ज रु.१०.४२ कोटी माफ करण्यात यावे.

२.  लाभार्थ्यांना थकीत कर्ज माफ करण्यासाठी महामंडळास प्रतिपूर्तीने अदा करावयाची रक्कम पुरवणी मागणीद्वारे अथवा आकस्मिकता निधी मधून उपलब्ध करुन देण्यात येईल.

३.  शासन निर्णय, सामाजिक न्याय विभाग, क्र.बैठक-२००९/प्र.क्र.२७/विघयो-२ दि.२५/८/२००९ अन्वये स्थापन करण्यात आलेल्या प्रधान सचिव (वित्त) यांच्या अध्यक्षतेखालील समितीने राष्ट्रीय बँकांच्या प्रतिनिधींशी बैठक आयोजित करुन दि.३१/३/२००७ अखेर थकीत असलेले कर्ज व व्याजाबाबत तडजोड करुन परतफेडीची रक्कम निश्चित करावी व ती रक्कम माफ करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

४.  हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५५९/०९/ व्यय-६, दि. २८/०८/२००९अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६.  हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२००९०८२८१८२०५१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वि. रा. शिरसाट )
शासनाचे उप सचिव

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा. सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
अध्यक्ष, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर,
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
वित्त विभाग,(अर्थसंकल्प-१९, व्यय-६ व साऊ ) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, (कार्या.१४४३).
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई.
सर्व जिल्हा रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रे,
व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ,मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई,
निवड नस्ती, रोस्वरो-१